केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरीता निधी वितरीत करणेबाबत..
लेखाशिर्ष (२२१० एफ ७३८)

# महाराष्ट्र शासन

## आदिवासी विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९ / प्र.क्र.०५ / कार्यासन. ६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

**तारीख: ३० नोव्हेंबर, २०१९.**

वाचा -

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि.०१.०४.२०१९.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि.०८.०७.२०१९.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२०१९/प्र.क्र.०५/कार्यासन.६ दि.०८.११.२०१९ व दि.२५.११.२०१९.
४) केंद्र शासन, सार्वजनि आरोग्य आणि कुटूंब कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.G.२७०१७/३४/२०१९-२०/NHM- (F)/१२ दि.२७.०८.२०१९.
५) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र. एनएचएम -०९१९ / प्र. क्र.४७७/ आरोग्य -७.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेककरीता सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र. टी-५, २२१०, वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य,(७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०४) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान (केंद्र पुरस्कृत योजना ) (६० टक्के केंद्र हिस्सा ) (अनुसूचित जमाती ) (२२१० एफ७३८) , ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशीर्षाखाली **एकूण रु. १२४६९.६१ लाख** तरतूद अर्थसंकल्पित आहे. यापैकी संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयाद्वारे यापुर्वी अनुक्रमे रु. ३०६.०० लाख व रु.५०.८७ लाख असा **एकुण रु. ३५६.८७ लाख** ( अखर्चित निधी ) इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

२. आता राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता सन २०१९-२० या वर्षाकरीता केंद्र शासनाकडून संदर्भ क्र.४ येथील पत्राद्वारे आदिवासी घटकांकरीता केंद्र हिश्श्याचा रु.७४७०.०० लाख इतका निधी राज्यास वितरीत करण्यात आला आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र.५ येथील प्रस्तावास अनुसरुन उपरोक्त अर्थसंकल्पीत तरतुदीतुन या योजनेच्या केंद्र हिश्श्यासाठी **(२२१० एफ ७३८), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली रु. ७४७०.०० लाख ( रुपये चौऱ्याहत्तर कोटी सत्तर लाख फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिपक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना** अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. नियंत्रक अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन

दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान तसेच सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रक अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तीक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन १ व २ येथील शासन निर्णयान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच अनौ.संदर्भ **क्र.३२५/अर्थोपाय ,दि.११.०९.२०१९** नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११३०१२१८२६१२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2019.11.30 16:15:43 +05'30'

**( किरण कि.पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. कार्यासन क्र. २ व ८, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग